**विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत सन २०१०-११ साठी केंद्र शासनाकडून वितरीत करण्यात आलेले भांडवली मालमत्ता अनुदान खर्च करण्यास मंजूरी...**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांक - विकेंस- २०१०/ प्र.क्र.०४/ का.१९
मंत्रालय, विस्तार भवन,मुंबई.४०० ०३२
दिनांक : ७ ऑक्टोबर, २०१०.

**वाचा** : १) शासन पत्र, आदिवासी विकास विभाग, क्रमांक - विकेंस- २०१०/ प्र.क्र.०४ /का-१९, दिनांक २९ जुलै,२०१०.
: २) शासन पत्र, आदिवासी विकास विभाग, क्रमांक - केंद्रीय- २०१०/ प्र.क्र.०५ /का-१९, दिनांक १ सप्टेंबर,२०१०.
: **३) भारत सरकार, जनजातीय कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक १४०२०/ २(१३)/ २०१०- एसजी-II, दिनांक २१ सप्टेंबर, २०१०.**

**प्रस्तावना :-** भारत सरकार, जनजातीय कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांनी त्यांच्या दिनांक २१ सप्टेंबर, २०१० च्या पत्राव्दारे विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत सन २०१०-११ साठी भांडवली मालमत्ता ( **Capital Assets** ) म्हणून रू. ४७०३.०० लक्ष मंजूर केले असून त्याचा पहिला हप्ता म्हणून रू. २४ कोटी एवढे अनुदान वितरीत केले आहे. केंद्र शासनाने मंजूर करून वितरीत केलेले सदर अनुदान ते ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्या कारणासाठीच त्वरीत खर्च करण्याचे आदेश निर्गमित करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>** शासन आता या निर्णयाद्वारे केंद्र शासनाने विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत सन २०१०-११ या वर्षासाठी भांडवली मालमत्ता ( **Capital Assets** ) म्हणून मंजूर करून वितरीत केलेले एकूण रू. २४,००,००,०००/- ( रूपये चोवीस कोटी फक्त) अनुदान आहरीत करून केंद्र शासनाने मान्यता दिल्याप्रमाणे पुढील बाबींसाठीच खर्च करण्याचे अधिकार आयुक्त , आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांना प्रदान करीत आहे

भांडवली मालमत्ता ( **Capital Assets** )अनुदान : रू. २४००.०० लक्ष

| अ.क्र. | कामाची बाब | वितरीत करावयाचे अनुदान ( रू. लाखात ) | लक्षांक |
|---|---|---|---|
| 1 | **Watershed development, Horticulture/ Minor Forest Produce( Non-Timber Forest Produce - NTFP) /Medicinal Plants cultivation on the private land owned byTribal farmers, by Preparing Site specific treatment Plan** | 500.00 | 1000 (24 ITDP) |
| 2 | **Development of Forest land on which titles are given under Forests Right Act( levelling, terracing, nala bunding, planting with medicinal/MFP/ horticulture plants, etc as per the requirement and site specific treatment plan)** | 500.00 | 1000 (24 ITDP) |
| 3 | **Establishment of Cashewnut Processing unit for Tribals.** | 100.00 | 40 groups (5 ITDP, Thane Division) |
| 4 | **a)Incense stick making training and production** | 75.00 | 400 |
| | **b) Lac cultivation training and production** | 400.00 | 20000 (24 ITDP) |
| | **c) Bamboo Craft Training** | 247.00 | 2470 |
| | **d) Honey Bee cultivation training and production through Tribals/ NGOs** | 100.00 | 1000 |
| 5 | **Vermiculture training and production ( Tetra bed) with the help of Agriculture Deptt./ Forest Department./ NGOs** | 100.00 | 1000 (24 ITDP) |
| 6 | **Erection of Solar Fencing to protect crops from wild animals.. TDD/FD** | 378.00 | 300 (24 ITDP) |
| | **TOTAL** | 2400.00 | |

२. सदर खर्च "मागणी क्रमांक टी-५, मुख्य लेखाशिर्ष :२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२- अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना-(०१)- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - विशेष केंद्रीय सहाय्य योजना ( ०१ ) (४१) केंद्रीय सहाय्याची एकात्मिक योजना (२२२५ ३५५६ ) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या अर्थशिर्षाखाली सन २०१०-११ च्या अर्थसंकल्पीत तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर अर्थसंकल्पीत तरतूदीमधून वर अ.क्र.४ येथील वन विभागाशी संबंधीत बाबीसाठी वितरीत करावयाची एकूण रू.८२२.०० लक्ष रक्कम आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी वन विभागाच्या प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडे खर्चासाठी त्वरीत वर्ग करावी. त्यादृष्टीने सदर रक्कम B.D.S.वर दाखविण्याची कार्यवाही त्वरीत करण्यात यावी.

४. वर मंजूर करण्यात आलेली रक्कम ती ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावी व त्यासंबधीत उपयोगिता प्रमाणपत्र (U.C.), आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्यात यावे. सदर निधीच्या खर्चास प्राधान्य देण्यात यावे व निधीच्या खर्चाचा अहवाल दरमहा शासनास सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा शासन निर्णय,राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध केला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१०१००७१३३०१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु. द. पडवळ )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक (५ प्रती)
आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
अपर आयुक्त,आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर (प्रत्येकी २ प्रती)
**सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.**
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी / सर्व जिल्हाधिकारी.
महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर.
संचालक, भारत शासन, जनजातीय कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली-११०११५.
खाजगी सचिव, मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.३२.
प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर .
नियोजन विभाग/ वित्त विभाग/ कृषि विभाग / वन विभाग/ जलसंधारण विभाग.
अवर सचिव, मा. मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
संचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई ( जाहिर प्रसिध्दीकरिता).
**कार्यासन अधिकारी, का-६,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.. B.D.S.संबंधीत आवश्यक कार्यवाही त्वरीत करण्यासाठी.**
कार्यासन क्र-९/१४/संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती (का.१९), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.